GR-200408061237220015-1201

इंदिरा आवास योजनेंतर्गत बांधण्यात येणा-या घरकुलांच्या किंमतीचे सुधारीत निकष.

---

महाराष्ट्र शासन,
ग्रामविकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय, क्रमांक: इंआयो-1096/प्र.क्र.89/जल-17,
मंत्रालय, मुंबई-400 032, दिनांक 30 ऑक्टोबर, 1996.

वाचा :- (1) शासन निर्णय, क्रमांक: इंआयो-1096/प्र.क्र.10/जल-17, दिनांक 16 मार्च, 1996.
(2) केंद्र शासनाचे पत्र क्रमांक-11011/94-आरएच, दिनांक 23 जुलै, 1996.

प्रस्तावना :- इंदिरा आवास योजनेंतर्गत घरांच्या विहित किमतीत मजबूत व टिकाऊ घरकुले बांधणे शक्य होत नाही ही बाब राज्य शासनाच्या निदर्शनास आल्याने घरांचा दर्जा तसेच विहित किमतीत वाढ करणेबाबतचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. त्याप्रमाणे राज्य शासनाने दिनांक 16 मार्च, 1996 रोजी शासन निर्णय काढून इंदिरा आवास योजनेंतर्गत बांधण्यात येणा-या घरकुलांची किंमत रु.30,000/- पर्यन्त निश्चित केलेली आहे. यामध्ये बांधकाम खर्चासाठी रु.9,000/-, निर्धुर चुलहा, शौचालय व परिसर सुविधा यांसाठी रु.5,000/- अशा प्रकारे पूर्वीच्याच निकषाप्रमाणे एकूण रु.14,000/- एवढा केंद्र शासनाचा हिस्सा दाखविला व त्यास जोडला. राज्य शासनाचा हिस्सा रु.14,500/- व मजुरीच्या स्वरुपात लाभार्थ्यांचा हिस्सा रु.1,500/- एवढा दाखविला आहे. संदर्भाधिन केंद्र शासनाच्या दिनांक 23 जुलै, 1996 च्या पत्र क्रमांक-2 नुसार केंद्र शासनाने त्यांच्या हिश्श्यात रु.14,000/- (राज्य हिस्सा रु.2,800/- सहीत) वरुन रु.21,000/- पर्यन्त (राज्य शासनाचा हिस्सा रु.4,200/- सहीत) वाढ केलेली आहे. त्यामुळे राज्य शासनाचा अतिरिक्त हिस्सा कमी करणे क्रमप्राप्त ठरले आहे.

शासन निर्णय :- वरील स्पष्टीकरणास अनुसरुन इंदिरा आवास योजनेंतर्गत बांधण्यात येणा-या घरकुलांच्या बांधकामाचे निकष आता राज्य शासनाने खालीलप्रमाणे निश्चित केलेले आहेत:-

केंद्र शासनाच्या सुधारित निकषाप्रमाणे घरकुल बांधणीचा सरासरी खर्च रु.21,000/- यामध्ये केंद्र व राज्य सरकारचा हिस्सा अनुक्रमे 80:20 असे प्रमाण राहील. तद्नंतर मजबूत व टिकाऊ घरकुल बांधताना कमी पडणारा राज्य शासनाचा अतिरिक्त निधी रु.7,500/- इतका राहील व उर्वरित रु.1,500/- एवढा निधी लाभार्थ्यांचा हिस्सा हा मजुरीच्या स्वरुपात राहील.

थोडक्यात निधीबाबतचे विश्लेषण खालीलप्रमाणे राहील.

| | |
|---|---|
| केंद्र सरकार (राज्य शासनासहीत) | 21,000/- |
| राज्य सरकार (अतिरिक्त निधी) | 7,500/- |
| लाभार्थी | 1,500/- |
| बांधकामाचा खर्च एकूण रुपये - | 30,000/- |

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

मो. वा. अप्पलवार,
सह सचिव,
(जलसंधारण),
महाराष्ट्र शासन.

शा.म.मु.रोटा/एच-924(ब)(1200-11-96)

(कृ.मा.प.)